# मंजुघोषा नाटक.

मंगलाचरण.



पद. "वंदन त्या ईशा" ही चाल.

भो भवभयशमना ॥ ईशा ॥ गौरिसुता गजवदना ॥ ईशा ॥ कुसुमांजलि हा प्रेमानंदे अर्पणकरिताहें तव चरणां ॥ धृ० ॥ विघ्नें सकल हरीं ॥ ईशा ॥ कवनीं रंग भरीं ॥ ॥ ईशा ॥ मजसिं धरुनि करीं ॥ ईशा ॥ भवनिधि पार करीं ॥ ईशा ॥ विठ्ठलसुत बळवत्कवि विनवी कृपाप्रसादें उद्धरी दीनां ॥ १ ॥

पद. "साध्यनसे मुनिकन्या०" ही चाल.

रघुकुलभूषण सकलां ॥ सुखकर होवो या रसिकांला ॥ भ०॥ नारद तुंबर सनकसनंदन ॥

सुरवर किन्नर योगी मुनिजन ॥ गाती लीला प्रेमें निशिदिनीं ॥ तो प्रभु प्रेमानंदें ॥ बुध-जनभवभय नेवो लयाला ॥ रघुकुल० ॥ दुर्धर-दानव करुनी कंदन ॥ ज्यानें केलें सुरवरमोचन ॥ नामें तरती अतिपातकिजन ॥ तो प्रभु प्रेमानंदें ॥ सुरुची देवो मम कवनाला ॥ रघुकुल० ॥ १ ॥

सूत्र०—( पुढें होऊन ) त्या जगद्वंद्य भगवंताचे गुणानुवाद किती जरी वर्णन केले तरी ते थोडकेच आहेत. ( पडद्याकडे पाहून ) बरें, पण मी प्रियेला नेपथ्य संबंधीं सिद्धता करून रंगभूमीवर लौकर ये, असें सांगितलें असून ती अद्याप कां बरें आली नाहीं ? ( पाहून ) ती पहा आलीच—

पद. "सुस्वर सुरुचीर०" ही चाल.

सुंदरी ही सुंदर किती दिसतसे तरी ॥ रंभेपरिभासतसे खचित अंतरीं ॥ धृ० ॥ हरित-दुकुल शोभा बहु देत तनुवरीं ॥ चमके नभीं मेघांतुनि विज ज्यापरी ॥ पाहुनि मन्मानसिं अती शांति ये खरी ॥ धन्य धन्य भाग्यवान मी जगांतरीं ॥ १ ॥

 

( इतक्यांत नटी प्रवेश करते )

**नटी**—( प्रवेश करून )

पद. "त्या निर्लज्जाची०" ही चाल.

काय असे हो आपुली आज्ञा कथन करा मज त्वरित प्रिया ॥ मज० ॥ सिद्ध असे ही दासि पदाची ॥ कथन ० ॥ धरुनि दया ॥ हृदिं सदया ॥ बाहियलें कां रंगस्थलिं या ॥ ॥ कथन० ॥ मज० ॥

**सूत्र**— ( तिच्या गळ्यांत हात घालून ) प्रिये

पद "झाली ज्याची उपवर." ही चाल

सुजनावली या रंगस्थलीं ही ॥ उच्छुक होऊनी बसली पाहीं ॥ धृ० ॥ अभिनव नाटक दावुनी सखये ॥ तोषवूं यांना अन्य न कांहीं कर्णतृषाहर गायन करुनी ॥ रमवी रसिकां तूं लवलाहीं ॥ १

**नटी**—

पद- " जब्केकलंदर " हीचाल

परम निंद्य या नाट्यकलेचा सोडुनि द्या

तुह्मीं नाद प्रिया ॥ योग्य न भासे पथ हा मज-
ला, काल न दवडावा वायां ॥ धृ० ॥ याच्या
पायीं होति जन दुर्व्यसनी ॥ ईश प्राप्ति होत
नाहीं तया ह्मणुनी ॥ त्यजा त्यजा या विचा-
रा जाणुनि मनीं ॥ १ ॥

**सूत्र**—( तिच्या हनुवटीस हात लाऊन ) प्रिये-

**पद.** " चालवरील. "

नाट्यकलाही रम्य किती जगीं रमवितसे
सकलांला ॥ अज्ञ जनाला सुपथ दाखउनि
पोचवितीहे मोक्षाला ॥ धृ० ॥ सुज्ञजन मानि-
ताती सुकला ही ॥ कालिदास शूद्रकादि कवि
तेही ॥ कविगणीं गणियले इच्या पायीं ॥ १ ॥

**नटी**—बरें, पण प्रियकरा, आजच्या या अभि-
नव नाट्य प्रबंधांत कोणत्या महाभागाचें चरित्रवर्णन
केलें आहे.

" दिंडी "

स्वरूपशालिनि जी सकललोकमान्या ॥ मंजु-
घोषा अतिसुगुणि राजकन्या ॥ दाऊं चरिता

तत्करुनि आजि येथें ॥ तोष देउं या रसिक-जनमनातें ॥ १ ॥

"पडद्यांत"

**पद**. "मानसिंभरली रसिका०" ही चाल.

लावया मज त्या प्रिय संदीरला ॥ मंजुघोषा हें नामें जियेला ॥ धृ० ॥ गुणरूपावरीं मन्मानस हें ॥ अतिशय रमुनी गेलें आहे ॥ ह्मणुनीं चैन न व्याकुळता ये ॥ काम जाळि बहू या मत्तनुला ॥ १ ॥

**नटी**—( ऐकून ) नाथा, हा कामव्यथेनें विव्हल कोण बरें असावा ?

**सूत्र०**—( पाहून ) प्रिये—

**"साकी"**

वसंतमाधव नामें नृपसुत कामपिडेनें पिडुनी ॥ तो पहा इकडे आला सखये जाऊं चल गे निघुनी ॥ न धरी भय चिंता ॥ पाहूं त्याच्या सच्चारिता ॥ १ ॥

( दोघेंही निघून जातात )

**वसंतमाधव.**—( पडद्याबाहेर येऊन ) "दावा मज त्या प्रिय सुंदरी." ( हें पूर्वोक्त ह्मणून ) हा समोर दिसत असलेला महाल बहुधा त्या राजकन्येचाच असावा अहाहा ! या महाला भोंवताली असलेल्या उद्यानाचा प्रदेश किती तरी रमणीय दिसत आहे.

**पद.** "सुखोपभोगा योग्य०" ही चाल.

पुष्पतरूवर जागजागीं हे कितीतरी फुललेले ॥ दिसती माझ्या नयनांलागीं पाहुनि मन डोले ॥ फलभारानें अनेक असती तरु हे लवलेले ॥ शोभा देती नव पल्लव किती त्यांना फुटलेले ॥ मधुकर गुंजारव करण्याला पुष्पावरीं आले ॥ पाहुनियां मन्मानस प्रेमानंदानें डोले ॥ १ ॥

आतां हें विमान या बागेंत उतरवून महालांत जावें आणि एकवार त्या सुंदरीचें दर्शन तरी घ्यावें. ( विमान खालीं आणून आपण उतरतो व इकडे तिकडे फिरून आनंदानें ) अहाहा ! येथें उतरतांच जणु काय मी इंद्र भुवनांतच आहें असें वाटूं लागलें आहे.

( विमान झाडाच्या आड लपऊन )

पद. "बलसागर तुह्मी०" ही चाल.

आलों येथें विमानि बसुनी परि हृदय बहु उडतें ॥ कोणी पाहिल ह्मणुनी पाउल पुढती नच पडतें ॥ वाटे जाईल मम मित्राचें वचन हि सिद्धि दिसतें ॥ महाला माजी रात्र ह्मणुनियां शांत सर्व दिसतें ॥ १ ॥

इकडे तिकडे फिरून ) हें महालाचें द्वार उघडें आहे र आतां आंत प्रवेश करावा ( द्वाराजवळ जाऊन रत येतो व आश्चर्यानें ) अरे, अशा मध्य रात्री-या समयीं हा मधुरध्वनि कोणाचा बरें ऐकूं येत हे ! ( कानोसा घेतो )

मंजुघोषा पलंगावर निजली आहे असा पडदा उघ०)

मंजु— ( झोंपेत )

पद. " नंद प्रह्माच्या जवळ० " ही चाल.

सुंदर रूपा वानु किती ह्या मन्मानस रेतो ॥ सखे गे० ॥ मदनमनोहर अजानु मजला रमवीतो ॥ खचित गमे ॥ कस्तु-तिलक भाळिं विराजे मदना लाजवितो ॥

खचितगे ॥ हृदय विदारुनि नेत्र कटाक्षें भाना भुलवितो ॥ खचितगे भा० ॥

( स्तब्ध रहाते. )

**वसं**-( आश्चर्यानें ) अरे मधुर परंतु स्पष्ट असे शब्द ऐकूं येतां येतां मध्येंच स्तब्ध राहिल्यानें कोणी झोंपेंतच बरळत होतें असें वाटतें. असो, आपण पण आतां आंत जाऊन इच्छित कार्य सिद्धिस न्यावें. ( आंत जातो ) अरे हें येथें कोण निजलेलें आहे बरें ( आनंदानें ) अहाहा ! हीच ती सुंदरी

**पद्**- " खेळुनि लतिका संगे० " ही चाल

सुंदर इतुकें रूप हिचें हें झोंपेंतही दिसतें जागृतीं पहतां मनुज कसा मग धरिलच धीरातें ॥ धृ० ॥ धन्य धन्य तें भाग्य पित्याचें ह्मणवितें ॥ पडेल ज्याच्या पदरीं त्याच्या न वदवे भाग्यातें ॥ १ ॥

( पुढें होऊन ] हे हिच्या अंगावरील अलंकार मजपेक्षां ही धन्य आहेत. आहाहा !

**पद्**- " अंगिकारकरूनि हिया० " ही चाल०

भूषणानीं धन्य तुह्मीं खचित जाहलां ॥
बघुनि हिचा केशकलाप अहिच भासला धृ०
धन्य मणी हारांतिल स्तनयुग्मीं बैसला ॥
ओंठावरि मौक्तिकावली भुलविते मला ॥
बघुनि हिला धन्य धन्य जन्म वाटला ॥

पद– " बलसागर तुह्मीं " ही चाल

निंबफला परी कुच हे तैसे हस्तही गोंडस किती असती ॥ कर्दळीस्तंभापरि उरु पाहुनी हर्ष होतसे बहु चित्तीं ॥ ध्रु० ॥ दंतपंक्ति जणु काय हिरकण्या अधरबिंब मज रमविती ॥ प्रफुल्लवदना सस्मित करण्या भासति जणु त्या विराजती ॥ १ ॥

पद " संततिसाठीं वरचे० " ही चाल.

शालु गुलाबी भरजरि नेसुनी पहुडली मंचकि सुंदरि ही ॥ गौरवर्ण तनु नाजुक बांधा शोभतसे तरी किति पाहीं ॥ ध्रु० ॥ पाहुनिय

स्वरूप हें मजसि उरीं ॥ मार मारिताहे अति तिक्ष्ण सुरी ॥ आलिंगिल ज्यासि तो धन्य महीवरीं ॥

(मंजुघोषा जागृत होऊं लागते)

अरे, ही आतां जागी होऊं लागली आहे. तर आपण येथून निर्भयपणीं निघून जाण्याची संधी मिळेपर्यंत कुठें तरी लपून रहावें हें बरें.

**मजु०**—(उठून डोळे चोळीत) बसंते अग बसंते.

**बसंती**—(प्रवेशकरून) जी बाईसाहेब काय आज्ञा आहे.

**मंजु०**–अग, गुळणा करण्याकरितां पाणी घेऊन ये.

**बसं०**—आज्ञा बाईसाहेब, (जाते व सुवर्णाच्या झारींतून पाणी घेऊन येते.)

**मंजु०**—(गुळणा करिते.)

**बसं०**–[ तोंड पुसण्यास रुमाल आणावयास जात असतां लपलेल्या वसंतमाधवास पाहून घाबरते व मंजुघोषेजवळ येऊन ] बाईसाहेब, येथें कोणसें बसलें आहे.

**मंजु०**-[ हंसून ] स्वप्नांत तर नाहींस ना तूं ? अग

येवढा पहारा उल्लंघन करून येथें कोण येऊं शकणार आहे ?

**वसं०**—बाईसाहेब, खरोखर कोणी बसलें आहे. मी आपली थट्टा का करितें ?

**मंजु०**—[ सभय ] खरंच का? अगबाई कोणी चोर तर नसेल ना? अथवा पुराणांत ऐकलेल्या कथांप्रमाणें कोणी यक्ष किंवा गंधर्व असेल.

**वसं०**–तें मी काय सांगूं [ मंजुघोषा व वसंती घाबरून एकामेकींकडे पहातात. ]

**वसं०**--[ स्वगत ] हिनें तर मला पाहिलेंच आणि उभयतां भयाभीतही झाल्या आहेत. तर आतां आपणच पुढें जाऊन त्यांची भीती दूर करावी हें बरें. [ पुढें जाऊन ] भिऊं नका भिऊं नका.

**मंजु०**–( लाजून वर उठते व खालीं मान घालून आपल्याशीं. ) स्वप्नांत पाहिलेली हीच ती मनोहर मूर्ति, ह्या देह यांच्या रूपावरून ओंवाळूनच टाकावा.

**वसं०**–( वसंतमाधवास. )

**पद.** " वाडवडीलांसिवांत०" ही चाल.

तुह्मि इथें आजि कांसया आला ॥ काय

असे हो नाम देहाला ॥ झडकरिं अवघें सांगा मजला ॥ होईल तरि मग सौख्य तुह्माला ॥

**वसं०**-सांगतों ऐकावें.

**पद.** "ठाउकमजला०" ही चाल.

देश बघाया बसुनि विमानीं आलों इतुका दुरीं॥ निष्कपटानें स्नेहत्वातें भालचंद्र तो वरी ॥ फिरतां फिरतां सहजचि गेली दृष्टी पहाऱ्यावरीं ॥ कौतुक झालें ऐकुनी कारण माझ्या हृदयांतरीं ॥ १ ॥

**बसं०**-आपण विमानांत बसून आलों ह्मणतां त्या अर्थी आपण कोणी यक्ष किंवा गंधर्व असावेत.

**वसंत०**--

यक्ष नव्हे मी गंधर्वहि तो शंका न धरीं लवही ॥ देशाटन करण्याच्या इच्छें विमानि बसुनीं पाहीं ॥ आलों या स्थानीं ॥ भलती शंका नच आणी ॥ १ ॥

**बसं०**-बरें, आपण इथें कुठें उतरला आहांत ?

**वसंत०**-पेठेंत कोणी भालचंद्र नांवाचा सावकार.

पुत्र रहातो त्याच्या वाड्यांत मी उतरलों आहे.

**बसं०**-महाराज, आपल्या चिन्हांवरून आपण कोणी राजपुत्र असावेत असें वाटतें.

**वसंत०**-होय, वैदर्भदेशाधिपतीचा मी पुत्र आहें. माझें नांव कुमार वसंतमाधव.

**बसं०**-माहाराज, या आसनावर बसावें.

**वसंत०**-आपणही बसावें. ( सर्व बसतात. )

**वसं०** एकून आपलें लग्न झालेलें नसावें असें वाटतें.

**मंजु०**—( आपल्याशीं ) हृदया, धीरधर, तुझ्या शंकेची निवृत्ती बसंता करीत आहे.

**वसं०**—तूं यथार्थ जाणलेंस; ह्मणूनच मी प्रथमतः नांव सांगतेवेळीं कुमार आहें असें सुचविलें होतें.

**बसं०**- बरें, आपणास भालचंद्रजीनीं काय सांगितलें.

**वसं०**-प्रथमतः त्यानें मला येथील राज्याविषयीं असें सांगितलें.

" अंजनी गीत "

चंद्रशेखर नामें नृपती ॥ विराजताहे या नगराप्रती ॥ प्रजाजनहि त्या अनुकुल असती ॥

अति उल्हासानें ॥ १ ॥ विहिरितलावां बांधूनियां किती ॥ धर्माचरणि सचिवहि राहाती ॥ तीर्थयात्रे करुनी पुरविती ॥ द्राव्यान्नालागीं ॥ यज्ञयाग ते विप्रांहस्तीं ॥ नगरामाजीं सतत चालती ॥ तेवि प्रजाजन नृपगुण गाती ॥ प्रेमानंदानें ॥ २ ॥

**वसं०**—बरें, आपण आणखी तें काय एकलें.

**वसं०**—

"साकी"

मंजुघोषा नामें आहे त्या नृपतीची कन्या ॥
दर्शन तीचें होत न कधिंही यत्नानेंही अन्या ॥
वरण्या नृप येती ॥ परि पण पाहुनियां
हरती ॥ १ ॥

तर ती हीच कीं काय तें विचारण्याची मला मोकळीक असावी.

**वसं०**—हें हो कशाला विचारायला पाहिजे, आपण जाणलेंच आहे.

**वसंत०**-(आनंदानें आपल्याशीं) अहाहा! येथपर्यंत तर सर्व प्रकार अनुकूल आहे.

**बसं०**-महाराज, आपल्या मनांतून कांही विचारायचं आहे असें वाटतें.

**वसंत०**-होय, आज्ञा असेल तर विचारतों.

**बसं०**-आज्ञा ती कशाला पाहिजे? संकोच न धरतां हवें तें विचारावें.

**वसंत०**—

"साकी"

निशिदिनिं येथें पहारा कशाला नाहीं त्या विश्रांती ॥ पाहुनियां तें वाटतसेंगे भारी कौतुक चित्तीं ॥ कारण सांगुनियां ॥ संशय माझा ने विलया ॥ १ ॥

**बसं०**-ऐकावें महाराज—

**पद.** "साध्य नसे मुनि०" ही चाल.

पाहुनियां स्वरूपातें ॥ भुलुनी जाती अवघे नर ते ॥धृ०॥ भूपें हीं स्थीति अवघी जाणुनी ॥ दिधलें हें स्थल यांनां बांधुनी ॥ ठेउनियां पहाऱ्यातें ॥ रक्षण करिती याचें येथें ॥ पा० १ ॥

**वसं**०-खरंच आहे कंदमुळें भक्षण करून तप करणारे

महान महान तपोनिधि सुद्धां सुंदर कामिनी बघून मोहित होतात. मग नित्य पौष्टीक आणि आणि कामोत्ते-जक पदार्थ भक्षणकरणारांची अशी स्थिती होते यांत नवल काय ? बरें मी आणखी असें विचारतो—

**पद.** "रुचती कां तीर्थ०" ही चाल.

अमुनीयरत्न ऐसें अजुनि न कां परिणिलें।
कारण त्या सांग मातें काय असें जाहलें ॥
वृत अथवा कुमारिकेचें सुंदरिनें वरियलें ॥
कीं कोणी आवडेना ह्मणुनीयां राहिलें ॥ १ ॥

**बसं०**—ऐकावें महाराज—

**पद.** "मी कुमार तीहि०" ही चाल.

या पूर्वी तुज्या मातेनें लग्नाचा निश्चय केला॥
मातुल पुत्रा द्याया भूपतिनें, दिन ठरविला।धृ०।
पारि निश्चय यांचा ठरला ॥ जो उल्लंघुनि पहा-
ऱ्याला ॥ येईल कीं या स्थानाला ॥ खचित
मी परिणिन त्यातें ॥ १ ॥

**वसंत०**—[ आनंदानें ] तर मग येथें आल्याचें सार्थक झालेंसें वाटतें.

**मंजु०**—[ वसंतमाधवाकडे बघून मान खालीं घालते ]

**वसं०**—[ मनांत ] आहाहा ! हिची माझ्यावर प्रीति आहे किंवा नाहीं याबद्दल संशयच नको.

**वसं०**—महाराज, मला आपणाजवळ कांहीं बोलावेंसें वाटतें पण आज्ञा असेल तर बोलेन.

**वसं०**—ठीक आहे, जें बोलायचें असेल तें बोल.

**वस०**—महाराज, चातकपक्ष्याची तृषा शांत करण्याचा धर्म स्वात्योदकाचा आहे किंवा दुसऱ्याचा ?

**वसं०**—त्या वांचून इतर कोणाचा असणार ?

**वस०**—तर मग आमच्या बाईसाहेबांच्या इच्छेप्रमाणें वागून त्यांना सुखी करावें हेंच माझें मागणें आहे.

**वसं**—हा माझ्यावर अनुग्रहच होय. या वांचून इतर दृष्टांत कोणते.

**पद्**—" वस्त्रानें देह सारा " ही चाल

मजलागीं भूमिही कीं इंद्राची भासते ॥
सुख भारी अंकि ध्याया शशिवदना वाटते ॥
मानस ना सुंदरीचें या विषयीं समजतें ॥
मन धरितें किंचितांशीं ह्मणुनी यां भीतितें ॥ १ ॥

**मंजु०**— (रागावल्या सारखें करून) बसते, स्वतंत्र होऊं पहातेस काय? माझ्या जिवाची कां तूं मालकीण आहेस वाटतें? तुला ग इतकी लांब जीभ करून कुणि बोलायला सांगितलें? आईबापाच्या आज्ञेवांचून मी कांहींच करणार नाहीं.

**वसं०**—बाईसाहेब, अशा रागावूं नका.

**पद**—"झाली त्याची०" ही चाल.

सुंदर सुगुणी ऐशा मदना ॥ प्रेमानंदें कांहो वराना ॥ धृ० ॥ भासतसां मज रतिमन्मथसम ॥ पाहुनियां तुम्हां परस्परांनां ॥ सुंदर० ॥ हंस न जाती मानस सोडुनी ॥ समजा बाई इतर स्थलांना ॥ सुंदर० ॥ वरिलें असतां जिंकुनिया पण ॥ जाणुनियां हें कोप न आणा ॥ सुंदर० ॥ १ ॥

**मंजु०**—

"अंजनीगीत"

जिंकियलें जरी मदीय पणाला ॥ तरी मी सोडूं कां लज्जेला ॥ कळउनियां निज वडिल जनाला ॥ वरितां योग्य असे ॥ १ ॥

**वसं०**—

**पद० " खेळुनीलति० " ही चाल०**

धरिशि अशी कां मानसिं भीती सांग सखे मजला ॥ करूनि पणातें या परि कांगे फिरविशि वचनाला ॥ धृ० ॥ अविवाहित मी जाण निजांतरिं राहुनियां सखये ॥ जिंकियला तव पण मी आजी साक्षि देव आहे ॥ पाळुनी आपुल्या वचनासी मज प्रेमानें वरिंगे ॥ मानिन मी जगीं मातृसमच कीं जाण अन्य स्त्रीला ॥ १९ ॥

**वसं**—महाराज, आमच्या बाईसाहेब परतंत्र आहेत. तथापि त्यांनीं कायावाचामनें करून आपल्याला वरलेंच आहे. आतां त्यांच्या इच्छेप्रमाणेंच कां होईना?

**वसंत०**—त्यांत वडिलांची आज्ञाच कशाला पाहिजे? शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें गांधर्व विधिनें विवाह करावा ह्मणजे झालें.

**वसं**—आपण ह्मणतां तसें केल्यास कोणी दोष तर देणार नाहीं ना?

**वसं०**—त्यात दोष तो कसला? पुरुवंशांतील दुष्यंत राजानें शकुंतलेशीं विवाह केल्याचें आपण ऐकलेंच असेल

बसं०—हो ऐकलें आहे.

वसं० तर मग हरकत ती कोणती?

बसं०—[ मंजुघोषेस ] मग बाईसाहेब, तसेंच कां होईना ?

मंजु०—अग तूं ह्मणतेस तें खरें पण—

" अंजनिगीत "

गांधर्वानें विवाह करितां ॥ चढले कोपालागीं जनिता ॥ वधुनी टाकील हं हं म्हणतां ॥ काय करूं पुढती ॥ १ ॥

वसंत०-त्याची भीति करण्याचें कारण नाहीं. राजाला कोप आलाच तर आपण विमानांतून आपल्या देशीं निघून जाऊं म्हणजे झालें.

बसं०-कां बाईसाहेब, करें.

मंजु०-मला तर बाई कांहीं सुचत नाहीं. 'इथ आड आणि तिथें विहीर' असें झालें आहे. तूंच काय तें सांग.

बसं०-दुसरें काय सांगायचें बाईसाहेब.

मंजु०-[ स्वगत ] हा वेळपर्यंत मी बतावणी केलीच पण आतां मात्र माझ्यानें धीर धरवत नाहीं.

**वसं०**-महाराज, आतां सांगणें म्हणून इतकेंच आहे यांना विरह न होईल अशी मात्र तजवीज व्हावी. त्या आपणाविषयीं किती उच्छुक आहेत हें आपणास सांगायला नकोच.

**वसं०**–वसंते तूं म्हणतेस तें खरें, परंतु–

" साकी "

त्वत्सखी अति उच्छुक मजविषयीं सांगाशि ऐसें मजला ॥ परि तिजविषयीं किति मी पीडित हें न कळे कां तुजला ॥ वदवेना वदनीं ॥ अति उच्छुक मी जाण मनीं ॥

**वसं०**--तर आतां माझं कांहींच बोलणं राहिलें नाहीं. ( मंजुघोषेस ) बाईसाहेब, आपली यमुनानांवाची धेनु वत्सासाठीं पाहलींका कसे हंबरडे फोडीत आहेती. तीला स्वस्थ करून येतें. [ जाते. ]

**मंजु०**--( उठून ) काय तर ही मला इथ एकटी टाकून गेली [ जाऊं लागते. ]

**वसं०**--[ उठतो व मंजुघोषेस धरून ]

"दिंडी"

सोडुनीयां मज जाउं नको कांते ॥ विरह-

वन्ही तव साहवे न मातें ॥ दिसे मंचक हा शून्य तुजविणा गे ॥ सौख्य देई येऊनी सखे मागें ॥१ ॥

( असें ह्मणून तिला वळेंच मंचकावर आणून जवळ बसवितो )

मंजु०—[ लाजून खालीं पहाते ]

वसं०—

पद. "येवदीमें पाया गम्" ही चाल.

मज नाहिं तुझ्याविण आण ॥ सत्य हें जाण ॥ मी वहातों गळ्याची आण मदीय तूं प्राण ॥ सत्य हें० ॥ धृ० ॥ मुद्रिका हि अंगुलीं ठेवी ॥ दिलि खूण हरीनें जेवीं ॥ गोपिकांस मुरली तेवी॥ मनिं न करीं गे अनमान॥ सत्य० ॥ १ ॥

मंजु०–प्राणनाथ, आपलें मजवरील प्रेम व दृढ निश्चय पाहून मी चंद्र व सूर्य यांस साक्षी ठेवून प्रतिज्ञा करतें कीं आपणांवांचून इतर पुरुष मला बंधु व जनकाप्रमाणें आहेत. आतां मीही आपली प्रीतीची खूण

देतें ती ग्रहण करावी. ( आपलीही मुद्रिका त्याच्या अंगुलींत घालते ).

**वसं**-[ तिच्या हनुवटीस हात लावून ] अहाहा ! आतां मात्र मी धन्य झालों. [ एकमेकांस आलिंगतात ]

**पद.** "लाल शालजोडी०" ही चाल.

मालति वल्ली सम केवळही वाटे मम कंठी पडली ॥ शंका माझी सर्व प्राणसखीने घालविली ॥ सद्गुणमंडित स्वरूपशालिनी ऐशी मजशीं यावेळी ॥ देउनियां त्या जगदीशानें मजवरीं बहु करुणा केली ॥ १ ॥

( "पडद्यांत" जयजयकार महाराज. )

"ओवी"

दिनकर आला नभीं प्राची त्यजोनि ॥ नृपगणहि तव मार्गि बसले नेत्र लाउनी ॥ धन्य करीं तयां निजपद दाउनी ॥ कृपा परिजनीं असो सदा ॥ १ ॥

**वसं०**-( ऐकून ) प्रिये ही पहा पहाट झाली.

"साकी"

दूर करुनियां तम तें सारें सूर्य प्रकाशित झाला ॥ शीतल वायु वहात असे हा देता बहु सौख्याला ॥ पक्षीगण तेही ॥ करिती किलकिलाट पाहीं ॥ १ ॥

मला आतां जाऊं दे; पुन्हां रात्रौ मी परत येईन.

**मंजु०**–प्राणनाथ, इथेंच कां रहाना. मी नाहीं जाऊं द्यायची.

**वसं०**–छे, छे, प्रिये ही रहाण्याची वेळ नव्हे—

"साकी"

कोणि येउनी या स्थलिं मजला पाहिल तुजसह दयिते ॥ येइल घाला ह्मणुनि कथितसें तुजलागीं हें कांते ॥ जातों मी इथुनी ॥ येइन होतां गे रजनी ॥ १ ॥

( पडदा पडतो )

**अंक पहिला समाप्त.**

---

## अंक २ रा.

### स्थळ— मंजुघोषेचा महाल.

**बसं०**--( प्रवेश करून ) आज बाइसाहेब नसल्यामुळें हा महाल कसा अगदीं शून्य दिसत आहे. मला तर कामकाज अगदींच सुचत नाहीं. महाराज वसंतमाधवजी तर दोनच्यार दिवसांनी परत येईन असें सांगून आपल्या मित्रावरोबर फिरावयास गेले आहेत. ( इकडे तिकडे पाहून ) अरे ही चतुरिका इतक्या घाईनें इकडे कां येत आहे वरें.

( गडबडीनें चतुरिका. प्रवेश करते )

**चतु०**--कायग वसंते, थोरल्या बाईसाहेब मगापासून हाका मारीत आहेत त्या तुला नाहिंका ऐकूं आल्या ? शर्थ केलीस बाई.

**बसं०**—तींग कशी ?

**चतु०**--अग तुला नाहिंका कळत? धाकट्या बाईसाहेबांच्या महालांत तूं निरंतर असतेसना ?

**बसं०**—म्हणून ग काय झालें ?

**चतु०** मग त्या गरोदर कशा राहिल्या हें तुला ठाऊक असलें पाहिजे.

**वसं०** मला ठाऊक असतें तर मी तुला नसतें का सांगितलें?

**चतु०** काय, तुला ठाऊक नाहीं ह्मणतेस? बरें, त्या पहा बाईसाहेबच इकडे येत आहेत.

[इतक्यांत रागानें लाल झालेली मेघावती येते.]

**मेघा०** कायग चतुरिके वसंतीला बोलवायला आलीस ती इथेंच का वसून रहालीस? अग तुला लाज कशी वाटत नाहीं. [वसंतीकडे पाहून] ह्या कार्टीचे पण कान फुटले वाटतें. हाका मारमारून माझा गळा कोरडा पडला तरी तुला ऐकायला नाहीं का आलं? निर्लज्ज कोठची. जा त्या अवदसेबरोबर आणि तिथे राहून तिच्याबरोबरच परत ये.

**वसं०** आज्ञा बाईसाहेब. [जाते]

**मेघा०** [इकडे तिकडे पाहून] काय करूं तो मेला जर कां माझ्या तावडीस सांपडता तर त्याची चांगलीच खोड जिरवली असती. आज चांगलीच संधि मिळाली आहे. देव करो आणि तो आजै येवो ह्मणजे झालं. ही अवदसा मरती तर एकदांची पिडा गेली असती. कार्टीनें कुळास बट्टा लावला. माझ्या भाच्याला

न बरतां जारकर्म करून पोट वाढविलें काय? पाहून घेतें आतां [ असें ह्मणून निघून जाते व चतुरिका शालु पांघरून मंचकावर निजते ]

[ इतक्यांत विमानातून वसंतमाधव येतो. ]

**वसंत०--**

**पद.** 'खेळुनी लतिका०' ही चाल.

जातो परदेशीं मी ऐसें कथितां प्रियसखिला ।
विरहाग्नीनें देह तिचा तो व्याकुळ बहु झाला ।धृ०
मित्र जवळ मम असुनी माझा जिव हा नच रमला ॥ रहित बेत मी करूनी आलों सखिच्या महालाला ॥ आलिंगन चुंबन घेऊनीयां शांत करिन तिजला ॥ १ ॥

आतां खालीं उतरून विमान लपवावें आणि आपण आल्याचें तिला सुचवावें ह्मणजे झालें. [ खालीं उतरून विमान लपवितो व चतुरिकेजवळ जाऊन ] अहाहा!

" साकी "

मतिप्रय सखिनें शालूपदरें अंग जरी झांकीलें ॥ तरि मुखचंद्रें तेजरहित त्या शशिलागीं

की केलें ॥ लज्जित होवोनी बसला मेघा आड लपुनी ॥ १ ॥

[ अधीर होऊन ]

'दिंडी'

प्राण सखये भेटण्या तुला आलों ॥ पहा यातें तव वदन अधिर झालों ॥ ध्यावयातें चुंबना मी भुकेलों ॥ नाहीं परदेशीं ह्मणुनि सखे गेलों ॥ १ ॥

अंजनीगीत.

ध्यास तुझा मज लागुनि सुंदरी ॥ चित्त वृत्ति बहु झाली बावरी ॥खान पान मज न सुचे भारी ॥ मदन पिडा देतो ॥ १ ॥ विरहाग्नीनें व्याकुळ होउनी ॥ आलों प्रेमानें तव सदनीं ॥ आलिंगन चुंबन देऊनी ॥ तोषवि प्राण प्रिये २।

काय करूं, प्रियेला सोडून क्षणभर सुद्धां मला वेगळं रहावत नाहीं.

'साकी'

प्रेमानंदे निद्रा करुनी शयना जरी तूं केलें।

तरि मम स्थल हें स्पर्श न करितां स्वच्छ असे राखीलें ॥ प्रेमें मज पाही ॥ झडकरीं आलिंगन देई ॥ १ ॥

( असें ह्मणून तोंडावरील पदर दूर करतांच चतुरिका 'धांवा, धावा' असें ह्मणत निघून जाते व आठ शिपाई धांवत येऊन वसंतमाधवास धरितात )

**वसंत**०—[ सभय ] अरे, हा माझी प्रिया नव्हे.

**पद.** "काय मला भूल०" ही चाल.

काय मला दुर्दैवें भूल पाडिली ॥ प्राणसखी मदीय असें ह्मणुन धरियली ॥ ध्रु० ॥ कर्मगती खचित खचित आजि उलटली ॥ मात सकल माझी कीं यांसी समजली ॥ ह्मणुनि वेळ आजि इथें त्यांनीं साधिली ॥ १ ॥

**दवलतसिंग**-ठेरो भुपसिंग, इस कंवरत्नका नाम पुछना चाहिये.

**भू० सिं०**—जो हुकुम.

**द० सिं०**—( वसंतमाधवास ) चलबे तेरा नाम कहदे.

**वसं०**—काय नांव विचारतां ?

"साकी"

स्वमुखें कधिंही सुज्ञ जनानें नामोच्चरण न करावें ॥ संपन्नचि जरी सकल सुगुणतरी आत्मगुणा नच गावें ॥ आग्रह हा त्यजुनी ॥ द्यावा विचार मनि करुनी ॥ १ ॥

**द० सिं०**—क्या, तूं तेरा नाम नहीं कहताहै ? इसमें तुझे कुच बेहतर नहीं.

**वसं०**-हे ह्मणतात हें ही खरंच आहे.

**पद.** "झाली ज्याची०" ही चाल.

कठिणची आहे माझी ही स्थिती ॥ हृदय उकलतें शोकानें अती ॥ धृ ॥ उग्रमुखाला बघतां यांच्या ॥ वाटत आहे मानसि भीती ॥ कठि० ॥ येथुनि सुटण्या युक्ति सुचेना ॥ कुंठित होऊनी गेली मन्मती ॥ कठि० ॥ १ ॥

**द० सिं०**-क्यौंबे गव्हार, तूं तेरा नाम नहीं कहताहै ? अच्छा, करले खुदाकी बंदगी.

वसं०—

**पद.** " बलसागर तुम्हीं० " ही चाल.

महत्संकटीं सांपडलों मी धांव जगत्पाला ॥
बुद्धी कैसी अपराधी या सुचली येण्याला ॥ध्रु०॥
प्रीती जडली त्याचा शेवट ऐसा हा घडला ॥
कांहिं सुचेना काय करूं मी जीव बहु घाबरला ॥ १ ॥

[सेनापती येतो, त्याला सर्व लवून मुजरा करतात.]

**पद.** " कंठ चरचर चिरु० " ही चाल.

अधम नष्टा या स्थलाशीं कासयाशीं पातलासी ॥ काय कारण तुजसि येण्या सांग दुष्टा त्वरित मजसीं ॥ मृत्युसदनीं जाणुनियां व्यर्थ मूर्खा कां रे पडशी ॥ राजकन्येस्तव तूं नीचा मृत्युलागीं पाचारीशी ॥ १ ॥

वसं०—

**पद.** 'व्यर्थ आह्मी अबला०' ही चाल.

व्यर्थ दोष मजला ॥ देता व्यर्थ० ॥ ध्रु० ॥

पण ऐकुनियां आलों येथें ॥ मंतु न मी केला॥ देता व्यर्थ० ॥ वाटे तुह्मा मी अपराधी तरी ॥ रक्षा दीनाला ॥ देता व्यर्थ० ॥ १ ॥

**सेना०**—मूर्खा, क्षमा मागण्याला तुला लाज नाहीं वाटत ? नीचा, तूं इथे कसा आलास.

**वसं०**--

**पद**. " रुचती कां तीर्थ० "

देशाटन करावयाशीं गृह आपुलें सोडिलें ॥ या स्थानीं येउनीयां पहारे हे पाहिले ॥ बहु कौतुक वाटुनीयां मित्राला पुसियलें ॥ ऐकुनियां कारणातें सुख मजसि वाटलें ॥ १ ॥

**सेना०**-मूर्खा, तुला असें सांगण्यास लाज नाहीं वाटत. ? या तुझ्या अनुचित कृत्याबद्दल तुला देहांतच शिक्षा दिली पाहिजे. ( असें ह्मणून इशारा करून निघून जातो ).

**वसं०**—काय, मला मारणार ? [ तलवार काढून ]

"साकी"

या खड्गानें तुकडे तुकडे करुनीयां मी आतां ॥ यमलोकाला पाठवितों हे अवघे हूं हूं ह्मणतां ॥ काय कथा यांची ॥ पर्वा नाहीं मज साची ॥ १ ॥

द०सिं०—बेवकूब, हरामखोर, तूं क्या हमारेसे सामना करनेकू चाहता है! पकडो हरामखोरकू ( असें ह्मणून त्याच्या आंगावर धांवत जाऊन लढूं लागतात. वसंतमाधव सद्दा जणांस घायाळ करतो. ते बेशुद्ध होऊन पडतात व दयाळसिंगासह भूपसिंग पळून जातो. )

वसं०—( आवेशानें हातांतील तलवार टाकून ) हरामखोरांनों या आतां माझ्या अंगावर! सूर्यापुढें काजव्याचा तो उजेड कितीसा? ( घायाळ पडलेल्या शिपायांकडे पाहून ) अरे, इथें तर सहाजणांचीच प्रेतें पडलीं आहेत. एकून दोघे पळाले वाटतें? [ इतक्यांत दवलतसिंग व भूपसिंग पाठीमागून येऊन वसंतमाधवास धरतात. ]

**द्व० सिं०**—(वसंतमाधवास धक्कीमारून) क्यौंबे अब कीधर जायेंगे.

**वसं०**—तुह्मी याप्रमाणें पाठीमागून धरल्यानंतर मी कुठें जावें?

**भू०सिं०**—अजि देखो, अब कैशी अर्जाजी करता है.

**द०सिं०**—क्यौं अभी नाम बोलता है के नहीं.

**वसं०**—माझ्या नांवाशीं तुह्माला काय करावया-चें आहे? तुमची मर्जीच आहे तर सांगतों. मी वि-लासपूरच्या राजाचा पुत्र, माझें नांव वसंतमाधव.

**द०सिं०**—[ आश्चर्यानें ] क्या, आप राजपुत्र हो? या खुदा क्या करूं पेटके वास्ते ऐसा हलका काम करना पडता है.

**वसं०**—

**पद** " लाल शाल जोडी० " ही चाल.

नाहिं कुणाचा अपराधीं मी व्यर्थ कशाला मज वधुनी ॥ वादवितां कां पातक सांठा नीच कर्म हें आचरुनी ॥ धृ० ॥ वरियेलें मज आनंदानें नृपकन्येनें या भुवनीं ॥ लाधे तुह्मा-

ला पुण्य कार्यें वैधव्याचे तिज देवोनी ॥ प्राणदान द्या ऐसें तुह्माला विनवितसें कर जोडोनी ॥ आभारी मी होइन तुमचा द्याल जरी मज सोडोनी ॥ १ ॥

**द्व०सिं०**—देखो महाराज, तुमकु हम छोडेंगे तो हमारी जान जायगी.

**वसं०**—माझा जीव वांचवाल तर मी तुमचे उपकार विसरणार नाहीं ( गळ्यांतील हार काढून )

" साकी "

रत्नजडित हा हार घेउनी मुक्त करावें मजला ॥ जन्मवरीं मी मानिन तुमच्या बहुतचि उपकाराला ॥ विनती मान्य करा ॥ आपुल्या हृदयीं प्रेम धरा ॥ १ ॥

( असें ह्मणून त्यांना हार देऊं लागतो. )

**द्व०सिं०**—देखो भूपसिंग, ये हार लेकर इनकी जान बचाना ये अच्छी बात है. आपनी जिंदगी बसर होयगी.

**भूपसिं०**—अच्छा [ हार घेऊन त्याला सोडतात.

**द० सिं०**—देखो महाराज, आप अभी त्यां मत ठेरो. इस सुराखमेंसे निकल जाव. और यहां कभीबी नहीं आना. ( भुयाराचें दार उघडून वसंतमाधवास पाठवून देतात )

**भू० सिं०**—( जातो व दुसऱ्या शिपायांसह येऊन मेलेल्या शिपायांस घेऊन जातात. )

"पडद्यांत" असें इकडून यावें बाइसाहेब.

( वसंतीसह मंजुघोषा येते )

**वसं०**—असें इकडून यावें बाईसाहेब.

**मंजु०**—गडे मी गेल्यावर प्राणनाथ इथें आले होते काय ?

**वसं०**—नाहीं बाईसाहेब.

**मंजु०**—( इकडे तिकडे फिरते व विमान पाहून) कायग वसन्ते प्राणनाथ आले नाहीं ह्मणतेस तर मग हें इथें विमानग कसें आलें ?

**वसं०**—[ विमान पाहून सभय ] बाईसाहेब, मला काय बरें ठाऊक !

**मंजु०**—प्राणनाथांनीं जाल्या वेळीं विमान नषतें कां बरोबर मेलें [ कांहीं चालून ] आणि हेंग काय

पडलेलें दृश्य [ पडलेल्या तरवारीकडे पाहून हायहाय असें म्हणून मूर्च्छित पडते. ]

बसं०—( घाबरते व वारा घालून ) बाईसाहेब, बाईसाहेब हें काय !

मंजु०—( सावध होऊन दुःखानें )

पद. "चंद्रकांतराजाची०" ही चाल.

भो जगपाळा काळ कसा हा मजवरती फिरला ॥ विरह आतां मी सोसूं कैशी तारी जगपाळा ॥ धृ० ॥ काय असा मम हस्तें मंतु सांग तुझा घडला ॥ कोपुनियां तूं म्हणुनी मजवरी नेलें प्रियपतिला ॥ लग्नसोहळा आमुचा तुजला कांरे नावडला ॥ शेवट त्याचा घातुक ऐसा काय म्हणुनि केला ॥ १ ॥

बसं—बाईसाहेब, शांत व्हा आपण असें हें काय करतां ?

मंजु—गडे, तुला काय सांगू !

पद. "बलसागर तुह्मी०" ही चाल.

रिक्त विमाना पाहुनी ऐशा धडकी बसली

उरीं ॥ वाटे नभगे कोसळलें तें माझ्या अंगा-वरी॥धृ॥ नृत्य करिति शुक, मैना तैशी गाती नाना परी ॥ सौख्य न त्याचें होय मलागे सत्य सत्य अंतरीं ॥ रक्तभरें या असितें बघुनी चरचर-ताहे उरीं ॥ जातें फाटुनी काळिज माझें विकळांगातें करी ॥ १ ॥

( असें म्हणून रडूं लागते. )

**बसं०**—( तिचे डोळे पुसून ) बाईसाहेब, हें असें काय करतां जरा शांत व्हा. ज्याअर्थी ही तलवार तुम्हांला या ठिकाणीं मिळाली त्याअर्थी ते पण इथंच कुठें तरी असतील.

**मंजु०**—गडे, हें सर्व कृत्य आईचंच असावें असं वाटतं. अथवा आईला तरी कां दोष देऊं. माझंच दैव म्हटलं पाहिजे--

पद " रूवतीं कां तीर्थ० " ही चाल.

मी जातें अन्य जागीं कां महाला सोडुनी ॥ तुजलागीं घालविलें असतें कां येथुनी ॥ पति माझे संकटीं गे कां पडते येउनी ॥ नये गे दया कांतीं मम मातें लागुनी ॥ १ ॥

**बसं०**—बाईसाहेब, आपण म्हणतां तें खरें; परंतु आपणच होऊन आपल्या मनाचें शांतवन केलें पाहिजे.

**मंजु०**—गडे, मी आतां कायग करूं तरी.

**बसं०**—( आठवल्यासारखें करून ) बाईसाहेब, या आपल्या महालापासून रस्त्यापर्यंत भुयार आहे त्या वाटेनें मी भालचंद्रजींच्या घरीं जाऊन त्यांचा शोध लावून येतें.

**मंजु०**—जा, ईश्वर तुला यश देवो म्हणजे झालं.

( बसंती भुयारांतून जाते. )

**मंजु०**—देवा, कसारे मजवर घाला पडला.

( भुयारांतून बसंती आणि वसंतमाधव येतात. )

**वसं०**—( मंजुघोषेचे डोळे पुसून )

"दिंडी"

शोक न करीगे प्राण सखे आतां ॥ ईश आमुचा जाहला पूर्ण त्राता ॥ युक्ति मजासि नच सुचत आतां कांहीं ॥ मला येथें राहण्या वेळ नाहीं ॥

**मंजु०**—प्राणनाथ, या दीन दासीला सोडून आपण कुठें गेला होतां.

बसं०--( तिच्या हनुवटीस हात लावून ) प्रिये, मजवर आलेला प्रसंग मी तुला नंतर सांगेन. तूर्त मला या ठिकाणीं रहाणें योग्य नाहीं. तुझा काय विचार आहे?

मंजु०--नाथा, हें काय विचारणें? मी आपल्या विचाराबाहेर का आहे?

बसं०--ठीक आहे तर, आतांचे आतां इथून निघून जायचें.

मंजु०--बसंते, तुझे मजवर फार उपकार झाले आहेत, ते मी कधींही विसरणार नाही. माझें स्मरण असूंदे व पुढें मी तुला आपले जवळ बलावून घेईन. काळजी करूं नको.

बसं०--बाईसाहेब, परमेश्वर तुम्हां उभयतांस परम सुख देवो व तुमचे हेतु सफल करो. ( डोळयांत आंसवें आणून ) पण मी तुमचा वियोग कसाहो सहन करूं! लहानपणापासून मी तुम्हांजवळ वाढलें. आतां मला बसंते म्हणून प्रेमानें कोणहो हाक मारील? ( रडूं लागते. )

मंजु०--( तिचे डोळे पुसून ) बसंते, नकोग रडूं. (बापाच्या नांवाचें एक पत्र लिहून तिच्या जवळ देते.)

**वसं०**--प्रिये, लौकर चल नाहीं तर आपणास येथें कोणी पाहील.

**मंजु०**--चलाच. वसंते, येतें आतां.

**वसं० मंजु०**--( विमानांत बसून ) वसंते.

**पद** " साध्य नसे मुनि कन्या० " ही चाल.

करुनी उपकारातें ॥ तोषविलें तूं बहुत अम्हांतें ॥ धृ० ॥ स्मरण सदोदित ठेवी चित्तीं ॥ विरह अम्हां तव जाचतसे अती ॥ परि न च उपाय त्यातें ॥ भेटूं पुनरपी खचिताचि तूतें ॥ १ ॥

( जातात. )

**अंक दुसरा समाप्त.**

---

## अंक ३ रा.

( वसंतमाधव मंजुघोषेसह विमानांतून प्रवेश करतो )

**वसं०**--

**पद** " साध्य नसे मुनि० " हीचाल.

जावें परदेशाला ॥ ऐसा माझा निश्चय

झाला ॥ धृ० ॥ परितव जाळी मज विरहाग्नी ॥ लोहचुंबका परिओढोन ॥ धरिलें मजला मार्गे ॥ म्हणुनी आलों तव महालाला ॥ १ ॥

प्रिये, इतक्यांत काय चमत्कार झाला पहा.

पद " वरील अंत्रा "

मंचकी परकिय नारी निजुनी ॥ सर्वांगातें वस्त्रें झांकुनी ॥ निद्रेचें मिष केलें ॥ त्या स्त्रीनें मम घात साधिला ॥ १ ॥

**मंजु०**—प्राणनाथ, माझ्या सुदैवानें त्या प्रसंगातून आपली सुटका झाली. या बद्दल मी ईश्वराचे फार फार आभार मानतें.

( इतक्यांत आकाशांत वीज चमकून मेघाचा गडगडाट सुरू होतो )

**मंजु०**—( सभय ) प्राणनाथ, मला फार भय वाटतें.

**वसं०**—प्रिये, अशी घाबरूं, नको. हें पहा—

" साकी "

मेघांनीं नभ आक्रमुनीयां सीतोदक वर्षतिते ॥ सौदामिनी लखलख चमकुनियां

झांकिती तारा गणते ॥ कडकड शब्द महा ॥
होतो सखये किति तरिहा ॥ १ ॥

**मंजु०**--

**पद** " वारियानें कुंडल० " ही चाल.

विपरित दैवाची गती आहे ॥ संकट ओढवलें दुर्धर हें ॥ धृ० ॥ जन्मा येउनी नृपवंशीं मी ॥ या निर्जन वनीं आलें पाहे ॥ विप० ॥ रहावें कसें अन्नजलाविण ॥ मूर्च्छा मजला पहा वरिताहे ॥ १ ॥

( मूर्च्छित होते )

**वसं०**--अरेरे, हिला तर मूर्च्छा आली. आतां काय करावें वरें. ?

( मंजुघोषा प्रसूत होऊन पुत्र रत्न होतें )

**वसं०**—अरे, ही प्रसूतही झाली. प्रिये, भिऊं नको.

**पद** " खेळुनी लतिका संगें " ही चाल.

विमान आतां झडकरीं खालीं उतरुनि भूवरती ॥ नेतो सखये खेद न धरि तूं किम-

पीही चित्तीं ॥ धृ० ॥ सुखकर होवो हें वन तुजला ईशकृपें करुनी ॥ त्यापरी सुखवो बालक हें अती क्रीडांतें करूनी ॥ रम्यवनीया न धरी लवही मानसिं तूं भीती ॥ १ ॥

मंजु०—( सावध होऊन ) प्राणनाथ, आतां लौकर विमान जमिनीवर उतरावें.

वसं०—प्रिये, भिऊं नको. हें पहा आपण अगदीं जमिनीजवळ येऊन पोंचलों. ( विमान जमिनीवर उतरतो ) प्रिये, आपण या जवळ दिसत असलेल्या पर्णकुटिकेंत जाऊं चल. ( तिचा हात धरून मुला सह पर्णकुटिकेंत घेऊन जातो )

मंजु०—( बसून ) प्राणनाथ, आतां आपण या अशा निर्जन अरण्यांतच रहाणार काय ?

वसं०—प्रिये, भिऊं नको. हें पहा.

“ साकी ”

आम्रवृक्ष हे नारिकेळ सह बघ या स्थानीं ॥ सुरम्याश्रमीं काळ कंठुंया प्रेमानें राहोनी ॥ भीति न हृदयिं धरीं ॥ जगदीशाचें स्मरण करीं ॥ १ ॥

**मंजु०**—( मुलाला अंकावर घेऊन त्याच्याकडे पाहून दुःखानें )

" अंजनीगीत "

विपरित आहे दैवाची गती ॥ दुर्धर संकट ओढवलें किती ॥ जन्मा येउनी नृपवंशाप्रति ॥ प्रसुत वनीं झालें ॥ १ ॥ हें मूल महालीं जन्मा येतें ॥ कष्ट कशाला ऐसे होते ॥ कोपुनियां ईशानें मार्ते ॥ हे दिन दाखविले ॥ २६ ॥

**वसं०**—प्रिये, अशा आक्रोशानें आपल्या जिवाला कांहीं एखादें भलतेंच करून घेशील. मला नाहींका दुःख वाटत ?

" दिंडी "

दुःख मन्मनिं जें होत असे कांते ॥ काय सांगु कुंठीत मती होते ॥ अति कोमल या अहा ! बालकाला ॥ नसे वस्त्रहि तें पांघरावयाला ॥ १ ॥

( मुल रडूं लागतें )

**मंजु०**—बाळ, उगी उगी हं

**पद " मानसिं भरली रसिका० " ही चाल**

दैवाची गती विपरित सारी ॥ झाली कैशी ही माझी परी ॥ धृ० ॥ उष्ण कधीं म्या नच सोशीलें ॥ घोर असें वन नच पाहिलें ॥ प्रसुतचि ह्या स्थानीं मी झालें ॥ हतभागी मीच त्या जगांतरी ॥१॥

वसं०—

पद "स्तला दर्भांकुर०" ही चाल.

नयनाश्रु सखे तव बघुनी ॥ जातें काळिज माझें फुटुनी ॥ धृ०॥ आवरि शोका लागुनी ॥ धैर्य जातसे माझें खचुनी ॥ जातसे तुटुनी जिव देहापासुनी ॥ सांगु किती गे सखये टाकी अश्रु हे पुसुनी ॥ १ ॥

मंजु०—[ पदरानें अश्रु पुसते व मुलास खालीं ठेऊन ] देवा, ह्या निर्जन अरण्यांत माझी स्थिति होणार.

"दिंडी"

कसें देऊं मी दुग्ध बालकाला ॥ नाहिं अन्नहि तें जरी खावयाला ॥ राखि माझी तूं

लाज जगत्पाळा ॥ जीव चिंतेनें शुष्क खचित झाला ॥ १ ॥

**वसं०**—प्रिये, मी विमानांतून जाऊन कांहीं सामग्री घेऊन लौकर परत येतों तूं कांहीं काळजी करूं नकोस.

**मंजु०**—( सभय ) काय, मी अशा निर्जन अरण्यांत एकटी राहूं ?

**पद** " तव मानस कैसें० " ही चाल.

करूं काय मी अशी एकली न सुचे कांहीं मला ॥ भीती वाटे मन्मानसिं फार सखया जिव पोळला ॥ घोर भयंकर रानीं दिसतो पशु पक्षीगण फार हा ॥ तुमच्या चरणीं शरणांगत मी नाहीं दुजा आधार ॥ कांहो त्यजितां मला ॥

**वसं०**—प्रिये, अशी भलतीच शंका मनांत कां वरें आणतेस ?

**पद** " काय मला भूल० " ही चाल.

भीशि अशी कां उगीच प्राण सखेगे ॥ प्राण कसे वांचतील अन्न नसुनि गे ॥ धृ० ॥

राक्षिं या बाळकासि धैर्य देउनी ॥ आश्रमांत राहि ईश स्मरुनियां मनीं ॥ सुखकर ही रजनि तुला ईश करो गे ॥ १ ॥

मंजु०--

पद. "मना तळमळशी०" ही चाल.

प्रिया या विपिनी ॥ जातसा कसें मज त्यजुनि ॥ असें मिष करुनी ॥ धृ० ॥ अन्नाविण नच राहिल जिवकीं ॥ भीति अशी दावोनी ॥ प्रिया या० ॥ भेटाया तुज येईन परतुनी ॥ उगिच असें मज कथुनि ॥ प्रिया या विपिनी० ॥ १ ॥

वसं०--प्रिये असें काय म्हणतेस ? पहा.

'साकी'

जिंकुनि सखये तव पण आलों उंच अशा त्या महालीं ॥ महत्संकटें मजवरि पडलीं तींहीं म्या सोशियलीं ॥ ऐसें जाणुनियां ॥ भलतें वदसी कां वांया ॥ १ ॥

**मंजु०**—प्राणनाथ, आतांतर मला बोलायला मुळींच जागा राहिली नाही.

**वसं०**--प्रिये, तूं स्वस्थ ऐस. मी लौकरच परतून येतों. [ मुलाचें चुंबन घेऊन ] अहाहा ! बाळा हे वनवास भोगणें तुझ्या दैवीं आलेंना ? जर तूं राजवाड्यांत जन्मला असतास तर तुझे किती बरें सुखसोहाळे झाले असते ! असो ईश्वरी लीला अगाध आहे [ असें ह्मणून आपल्या हातांतील रत्नजडीत ताईत सोडून त्याचे हातांत बांधून ] प्रिये, ही दिव्यौषधी माझ्या पित्याच्या गुरूनें मंत्रवून दिलेली आहे. हा ताईत जवळ असल्यानें प्राणिमात्रावर कोणतें जरी संकट आलें तरी त्याचें निवारण होतें. [ विमानांत बसून ] प्रिये, मी येतों आतां [ विमानासह जातो ]

**मंजु**--[ सुस्कारा टाकुन ] असो ईश्वरेच्छा. जें होणें असेल तें होईल. आतां क्षुधा निवारणार्थ कांहीं मिळाल्यास शोधून पहावें. [ उठते व आनंदानें ] अहाहा ! परमेश्वरा, तुझे किती तरी उपकार आठवूं अशा या निर्जन अरण्यांत हीं फलपुष्पीत झाडें तूं माझ्या करतांच काय निर्माण केलीं होतींस ? ( असें ह्मणून इकडे तिकडे फिरूं लागते )

[ इतक्यांत समुद्र वाढून मूल वाहून जातें ]

मंजु०--[ समुद्राकडे धांवल्या सारखें करून ] हाय हाय ! देवा, आतां मी काय करूं ! !

( कांहीं चालून आक्रोशानें ) देवा, आतां माझें बालक मी केव्हांरे पाहूं ?

पद " व्यर्थ अम्हीं अबला० " ही चाल.

आणुनि द्या मजला ॥ बालक आणुनि० ॥ धृ० ॥ मजवरि आजी कांहो इतुके ॥ प्रिय सखया कोपला ॥ बालक आणुनि० ॥ स्तनपानाही नाहीं केलें ॥ पाहु कुठें त्याला ॥ बालक आणुनि० ॥ साह्य मला नच कोणी येथें ॥ वाला हा पडला ॥ बालक आणुनि० ॥ १ ॥

( इकडे तिकडे पहाते व आम्रवृक्षांजवळ जाऊन )

" दिंडी "

दीन बालक मम जात वाहुनीयां ॥ स्वस्थ रहातां तरी कसे पाहुनीयां ॥ एकटी मी वनिं काय करूं येथें ॥ वांचवारे मम दीन लेंकुरातें ॥ १ ॥

अगबाई, हे वृक्ष तर कांहींच बोलत नाहींत. चंद्र-सूर्यांनों तुम्ही सुद्धां स्वस्थ बसलांना ?

पद " बलसागर तुम्ही० " ही चाल.

पतिनें अम्हांला तुमच्या स्वाधिन केलें जातांना ॥ ऐसें असुनी विपरित घडतें मनि कां समजाना ॥ येऊनी परतुनी अम्हांविषयीं ते तुम्हांस पुसतिलना ॥ द्याल तयांला काय उत्तरा मज कां सांगाना ॥ १ ॥

हाय ! हाय ! बाळा, ( इतक्यांत धरणीकंप होऊं लागतो. )

पद " अरे मुवे छोड मुजे० " ही चाल.

हालतसे थर्र् थर्र् भूमिही किती तरी ॥ धृ० ॥ नेत मज येथोनी ॥ कोणत्या ठिकाणीं ॥ वाटतसे भीति बहु काय करूं मी तरी ॥ मजसि बसियलें ॥ तरुहि ते उलथले ॥ बाल रुही सोडुन मज गेलें तें बहुत दुरी ॥ गेलें० ॥ काय करूं ऐशा संकटांत येथें ॥

प्राणपति न येति अजुनि धीर नाहिं अं-
तरीं ॥ धी० ॥

( असें म्हणून रडत खालीं बसते इतक्यांत एक दासी प्रवेश करते. )

**दासी**—[ प्रवेशकरून ] बाईसाहेबांनीं इथें कोण रडत आहे तें पहाण्याकरितां मला पाठविलें आहे. तर पुढें जाऊन पहावें. ( कांहीं चालून ) अरे, ही येथें कोण बरें शोक करीत बसली आहे. अहाहा! हिच्या रूपावरून हजारों रती ओंवाळून टाकाव्या. ( मंजुघोषेस ) बाई अशा भयंकर जंगलांत एकटीच येऊन शोक करीत बसणारी अशी तू आहेस तरी कोण ?

**मंजु०**—( दासीकडे पाहून ) बाई इथं येऊन माझ्या दुःखाची वाटेकरीण होणारी तूं कोण आहेस ?

**दासी**—बाई, येथील राणी आमच्या बाईसाहेब, यांनीं रडण्याचा स्वर ऐकून मला तपास करण्याकरितां पाठविलें.

**मंजु०**—[ दुःखानें ]

**" अंजनीगीत "**

शून्य दिसेगे हें जग मजला ॥ पाहूं कोठें

प्रिय बाळाला ॥ त्यापरि माझ्या प्राणपतीला ॥
सांग सखे मजसीं ॥ १ ॥ साहूं कैसें या
दुःखाला ॥ भेटवि झडकरीं बालक मजला ॥
नातरी माझा शेवट झाला ॥ समजे मनिं
आपुल्या ॥ १ ॥

**दासी**--बाई, तुझें दुःख पाहून माझें हृदय कसें तिळतिळ तुटत आहे; परंतु त्यांतही मनाचें शांतवन केलें पाहिजे. काय करणार ? सर्व गोष्टी प्राक्तनाधीन आहेत

**मंजु०**—बाई तुझें ह्मणणें अगदीं खरें आहे !

**पद**. "रुचती कां तीर्थ०" ही चाल.

सोडुनि कां पती जाते आणाया अन्न तें ॥
भुमिकंप होऊनियां बालक कां वाहतें ॥
मजलागीं तृतिय पंथी दैवचि कां आणितें ॥
शांतविण्या पुनरपि तें तुजला कां धाडितें ॥ १ ॥

**दासी०**--चला आतां बाई आमच्या बाईसाहेबांनीं बोलावलें आहे.

**पद**. 'कां आड सखे तूं येशी०'

तूं नेशी कुठे मज बाई गे ॥ तूं० ॥ ध्रु० ॥

प्राणपतीसह आलें या वनीं ॥ बालक गेलें मजला सोडुनी ॥ प्रियनाथाची चिंता बहु मनीं ॥ ह्मणुनी रहातें येथें गे ॥ १ ॥

दासी०—

पद " श्रीहरिच्या वेणुनादें० " ही चाल.

सांग सखे काय येथें करिशी गे बैसुनी ॥ पति कैसा तुला भेटे या रानीं येउनी ॥ धृ०॥ पाचारी राज्ञी तूं तें निजसदना लागुनी ॥ आदर तो गोड वेई हा तीचा मानुनी ॥ तिजलागीं चरित अवघें देईगे सांगुनी ॥ तव पतिला आणवीतें तच्छोधा लाउनी ॥ १ ॥

मंजु०=–( आपल्याशीं ) तूर्त हिच्याबरोबर जावें हेंच बरें. ( उठून )

पद " लग्नसमारंभेहीं० " ही चाल.

दैवानें मज आणियलें वनीं ॥ दैवानें० ॥ धृ० ॥ विवाह होउनि वाटतसे मज ॥ वायां

गेलें जन्मा येउनी ॥ दैवानें ॥ वाहुनियां मम बालक गेलें ॥ जलनिधितुनि या कवण्यास्थानीं ॥ दैव० ॥ १ ॥

( दासीसह निघून जाते. )

( पडदा पडतो. )

**अंक ३ रा समाप्त.**

---

## अंक ४ था.

( विमानांत बसलेल्या वसंतमाधव प्रवेश करितो. )

**वसं०—**

**पद** " सुने दिलदार गुल० " हीं चाल.

प्रिया माझी सोडुनीयां जनक जननी ॥ मदीयसंगें अहा ! आली सुगुणखाणी ॥ धृ०॥ गरोदर ती असुनियां मी आणियली ॥ प्रिया० मदीय प्राणाहुनिहि प्रियही सुंदरीती ॥ शून्य भासे तिच्या विणें मजसि भुवनीं ॥ १ ॥

( इतक्यांत विमान पेटतें व वसंतमाधव विमानासह खालीं पडतो. )

**वसं०**---( सखेदाश्चर्यानें )

**पद** " अंगिकार करूनि० " ही चाल.

दैवयोग काय आजि मदीय उलटला ॥
दग्ध यान होउनियां घात जाहला ॥ धृ० ॥
बालकासि नयनभरें नाहीं पाहिलें ॥ प्रिय
सखिला आणुनि वनीं दुःखीं लोटिलें ॥ जग
दीशे दुःखनिधी मजसि दाविला ॥ १ ॥

( इकडे तिकडे फिरून ) हाय हाय ! प्रिये, आतां मी तुला कुठें बरें पाहूं ? तुझ्या विरहाग्नीच्या ज्वाळा माझ्या अंगांत इतक्या भडकून गेल्या आहेत कीं, माझें हृदय जरी इतकें कठीण आहे तरी नवनीताप्रमाणें विरघळून गेलें आहे. याकरितां

**पद** " भैरवी-त्रिवट "

सुंदरी दर्शन देगे झडकरी ॥ सुंदरी० ॥
तुजवांचूनि मज उरि न जगांतरी ॥ सुंदरी०
॥ धृ० ॥ मार्गी तुजला सुत तो झाला ॥ प्रति-
कुल दैवें अंतर पडला ॥ धैर्य न उरलें
अंतरी ॥ सुंदरी० ॥ १ ॥

अहाहा ! सुंदरी तुझी त्या भयंकर अरण्यांत काय बरं स्थिति होईल ? देवा, प्रियेचा हा वियोग आतां मी कसारे सहन करूं.

पद् "झाली ज्याची उपवर०" ही चाल.

प्राण सखीला कोठें पाहूं ॥ विरह तिचा मी कैसा साहूं ॥ धृ० ॥ कोकिलमंजुल वाणि वदे जी ॥ शोधाया तिज कोठें जाऊं ॥प्राण०॥

काय करूं! परमेश्वरा, तुलासुद्धां माझी करुणा येत नाहीं ना? ( सुस्कारा टाकून ) असो हें विमान इथं जळत आहे त्यांतच थोडी सर्पणाची भर टाकून आपण आपला प्राणत्याग करावा हें बरें. प्रिया व पुत्रमुखावलोकनाची आतां आशाच नाहीं; तर आतां जिवंत राहून तरी उपयोग काय?

"साकी"

अर्पण करिताहे प्रिय सखये मी निज प्राणां तुजला ॥ जरि घडेना भेटी तरिही मानि मनीं सौख्याला ॥ तुजविण ध्यानिमनीं ॥ नाहीं माझ्या अन्य जनीं ॥ १ ॥

[इकडे तिकडे फिरून लांकडें जमवितो व अग्नी चेतवून आनंदानें] अहाहा ह्या विरह वेदनेपासून मला मुक्त करण्याकरितां अग्नीसुद्धां उत्कंठीत झाला आहे. अहाहा अग्ने, या अरण्यांत तुझी पूजा करण्याकरितां साहित्य नसल्याकारणानें मी मानसिक पूजा करतों ती ग्रहण कर.

पद " वीरा भ्रमरा० " ही चाल.

अग्निनारायणा विनवितों तुज द्वय कर जोडुनी ॥ पूजन घे मम संतोषुनी ॥ धृ० ॥ वहाती अश्रु प्रियसखीविरहें जे या नयनांतुनी ॥ स्नाना आदरि त्यां लागुनी ॥ चाल ॥ मत्प्राण रूप हें पुष्प तुला वाहुनी ॥ उष्ण स्वास घे धूपापरि मानुनी ॥ करपुरसम मम तनु ही घे समजुनी ॥ तारुण्यातें नैवेद्यास्तव अग्ने घे तोषुनी ॥ क्षमा करी अपराधा लागुनी ॥ १ ॥

(असें ह्मणून अग्नींत उडी टाकूं लागतो, इतक्यांत राजा सुधन्वा त्याला धरतो.)

**सुधन्वा—**

"अंजनिगीत"

कां करशी हीं अघटित करणी ॥ अग्नी-लागीं प्राण अर्पूनी ॥ इच्छिसि मरण्यां काय म्हणोनी ॥ सांग सकल मजला ॥ १ ॥

घसं०—

पद. 'बलसागर तुम्ही०'

काय तुम्हांला सांगु मजवरी संकट बहु पडलें ॥ दुःख दिलें ना कोणींही परी दैवानें छळिलें ॥ निर्जन रानीं आणुनि सखिनें म्यां अधमें त्यजिलें ॥ पाहूं कोठें बालक तेंही मजसी अंतरलें ॥ १ ॥

**सुधन्वा**—खरोखर तुझी स्थिती फारच करुणास्पद आहे तर.

'साकी'

संतति नाहीं मज तुज पाळिन मानुनि पुत्रा ऐसा ॥ खेद न मानी लवही चित्तीं सदनीं चल मज सरिसा ॥ स्त्री पुत्रा भुवनीं ॥ शोधुनि आणिन जाण मनीं ॥ १ ॥

वसं०--[ आपल्याशीं ] हा असा जवळ असून मला प्राण त्याग करूं देणार नाहीं करितां त्याच्या बरोबर आवें हेंच बरें [ उघड ]

'साकी'

पाहुनि तुमचा अत्याग्रह हा संतोषचि बहु झाला ॥ पोळवितािहे स्त्रीपुत्राचा वियोग बहु चित्ताला ॥ न सुचे काय करूं ॥ कैसा मानसिं धीर धरूं ॥ १ ॥

[ जातात. ]

अंक ४ था समाप्त.

---

## अंक ५ वा.

( मंजुघोषेच्या शोधाकरितां प्रवासी वेशानें तिचा बाप राजा चंद्रशेखर दूतासह प्रवेश करितो. )

चंद्र०--

पद्य " खेळुनी लतिका० " ही चाल.

सोडुनी बाळें माझीं कोठें त्यजुनि निजस-

दना ॥ कैसा द्यावा तुज वांचुनियां जगतीं धरि मना ॥ धृ० ॥ वदलों नाहीं कधिंही कन्ये कटु ऐशा वचना ॥ वृद्धपणीं मी सोगूं कैसा तुझिया विरहांना ॥ शोधूं तुजला कोठवरी मी घेउनी भृत्यजना ॥ नेत्राश्रु हे वाहुनि त्यांना मजसि बववेना ॥ १ ॥

**दूत०**—महाराज, असें आपण काय करतां ?

**चंद्रशे०**—काय करूं रे ?

**" अंजनी गीत "**

सखिचे हस्तीं पत्र पाठउनी ॥ जाणविलें वृत मजलागोनी ॥ नृपसुत सुगुणी वरिला अ-सुनी ॥ गुप्तचि ठेवियलें ॥ १ ॥ घोरपणातें केलें म्हणुनी ॥ विदित जाहलें सर्वां लागुनी ॥ मातुलसुत वरण्या कथि जननी ॥ तिज तें नावडलें ॥ १ ॥

**दूत**—आतां यांचें शांतवन करण्यास मला कांहींच उपाय सुचत नाहीं. [ इकडे तिकडे पाहून ] महाराज, तें पाहिलेंत का समुद्रांतून कांहीं वहान येत आहे.

**चंद्र**०--अरे हो, खरेंच.

" **साकी** "

जलधीतुनि ही गुप्तवस्तु पहा वहात येतसे कैशी ॥ भरजरतारी शालूसहही आनंदविते मजशीं ॥ तळमळ या देहीं ॥ न सुचे कन्येविण कांहीं ॥ १ ॥

बरें दुता, तूं पुढें जाऊन ती वस्तु सांपडली तर पहा बरें.

**दूत**—आज्ञा सरकार. [ जातो व शालूंत गुंडाळलेल्या बालकास आणून ] महाराज, यांत पहा काय आहे तें.

**चंद्र**०--[ पाहून आश्चर्यानें ]

" **साकी** "

क्षीराब्धीनें बालक हें मज आणुनियां कां दिधलें ॥ अथवा कोणी मति गुंगुनियां यालागीं त्यागीलें ॥ नकळे काय गती ॥ चालेना मम कांहिं मती ॥ १ ॥

**दूत**--महाराज, मंजुघोषा बाईसाहेब आपले श्वशुरग्रहीं तर गेल्या नसतीलना ?

**चंद्र**०--छेः तिकडील निराळीच वार्ता माझे कानीं आलेली आहे.

**पद** " चंद्रकांत राजाची कन्या० " ही चाल.

पुत्रवियोगें चंद्रकांत तो शोकाकुल झाला ॥
शोधायासीं पुत्रालागीं देश तयें त्यजिला ॥धृ०॥
भूपाकरितां प्रजाजनहि ते करिती दुःखाला ॥
त्यजिलीं मिष्टान्नें सुखशय्या मुकले सौख्याला ॥
पुत्रवियोगें माधवमाता त्यागी प्राणाला ॥ भासे
नगरी स्मशानवत हें कळलें रे मजला ॥ १ ॥

" पडद्यांत "

**" साकी "**

ध्याती मुनिजन प्रेमानें त्या स्मरण करा
नित रामा ॥ भवभयहर तो ध्यानीं आणा
पुरेल तुमच्या कामा ॥ लागा तच्चरणीं ॥
भृंगापरि रस सेवोनी ॥ १ ॥

दूत--[ ऐकलेंसें करून ] महाराज, इथें कुठं तरी जवळपास मुनीचा आश्रम असावा असें वाटतें. तर चला आपण शोध करूं.

चंद्रशे०—ठीक आहे. चल हो पुढें.

दुत—ठीक आहे. असें इकडून यावें महाराज, ( कांही पुढें जातात इतक्यांत आसनस्थ मुनी प्रवेश करितो )

मुनीः—( 'ध्याती मुनिजन०' हें पूर्वोक्त म्हणतो)

चंद्र०—[ पुढें होऊन ] मुनिवर्य, मी चंद्रशेखर आपणांस वंदन करितों.

मुनीः—कल्याण असो.

पद. 'भैरवी. त्रिवट'

श्रीराम आसो तुज त्राता ॥ राजाराम० ॥
जानकिपती जो पातकहर्ता ॥ राजाराम० । धृ० ।
सफल करो तव मनिचे हेतु ॥ क्लेश न उरवो
आतां ॥ राजाराम० ॥ १ ॥

चंद्र०—महाराज, माझी कन्या मला सोडून गेली आहे. तिला शोधित शोधीत मी इकडे आलों आहें.

**मुनि०**—तिला जाऊन आज किती वर्षें झालीं ?

**चंद्र०**—सुमारें चार, वर्षें झालीं.

**मुनि०**—जा तर या समोरच्या वाटेनें जा म्हणजे तुला तिचा शोध लौकरच लागेल. भिऊं नको जा.

**पद** " चाल वरील. "

रामस्मरण दिनरजनीं ॥ राजाराम० ॥ प्रेमानंदे करितां होतिल ॥ हेतु सफल तव भुवनीं ॥ राजाराम० ॥ धृ० ॥ भेटतील तव सुहृद सारे ॥ शंका न धरीं स्वमनीं ॥ राजाराम० ॥ १ ॥

[ सर्व निघून जातात. ]

[ पडदा पडतो. ]

**[ अंक ५ वा समाप्त. ]**

---

## अंक ६ वा.

( दोन दासी एकमेकींशीं बोलत प्रवेश करतात. )

**प० दासी—**

**पद** " मानसिं भरली रसिका० " हां चाल.

नृपकन्या किती मानसिं झुरूनी ॥ गेली आहे करपोनी ॥ धृ० ॥ सुंदर वलयें गोंडस करिंचीं ॥ सोडुनि मणिबंधा सह साचीं ॥ खालीं गळलीं असती तिचीं ॥ नयनास्त्रें नच खळती निशिदिनीं ॥ नृपकन्या० ॥ १ ॥

दु० दासी—आतांशीं तर गडे तिची फारच दशा होत चालली आहे; पण तुझ्यानें होईल तितकें तिच्या मनाचें शांतवन करीत जा बरें ?

प० दासी—

पद " झाली ज्याची उपवर० " ही चाल.

शांतवन बहु केलें आजवरी ॥ विपरित झालें सर्वहि तें परी ॥ धृ० बिनवियलें किती मी तिजला तरी ॥ घेत न अन्नोदक लवही-भरी ॥ वदनालागीं बघवत नाहीं ॥ कृश झालीगे सांगु किती तरी ॥

" पड्यांत "

' कामदा "

मोहपाश हा जाचतो मला ॥ झोंप येइना ध्यास लागला ॥ दुःख मी किती सोसु मानसीं ॥ मृत्यु येइना कां रे तो मशीं ॥ १॥

**पहि० दासी०**—( ऐकलेसें करून ) गडे, पाहिलेंस का मंजुघोषाबाई कशा शोक करीत बसल्या आहेत त्या. चल आपण त्यांचें शांतवन करण्यास जाऊं. [ तदनंतर वटवृक्षाखालीं शोक करीत बसलेली मंजुघोषा प्रवेश करते. ]

**मंजु०**—[ मोहपाश हा जाचतो० हें पूर्वोक्त ]

**पहि०**—[ मंजुघोषेजवळ जाऊन ] बाईसाहेब, आपणास म्हणावें तरी काय ? असा वारंवार शोक आपण कोठवर करीत बसणार. तशांत आपल्या येथें मंगलकार्य आहे. कांहीं विवेक करून मन आवरा.

**मंजु०**—सख्यांनों, परदुःख शीतळ म्हणून मला तुम्ही अशा गोष्टी सांगतां बरें.

**प० दासी**—बाईसाहेब, माझें म्हणणं असें नाहीं. येथें आपणास कांहीं कमी कां आहे ? वेळेनुसार पतीचीही भेट होईलच.

**मंजु०**—हीं केवळ कोरडीं अश्वासनं काय कामाचीं?

पद " झाली ज्याची उपवर० " ही चाल.

वांचवि सखये या समयाला ॥ साहूं कसें गे मी विरहाला ॥ धृ० ॥ विरहाग्नीनें देह पोळतो ॥ दावा कुणितरी मत्प्रिय पतिला ॥ भूपग्रहींची पुष्पशेज ती ॥ जाळितसे बहु या मत्तनुला ॥ वांच० ॥

[ रडूं लागते. ]

पहि० दासी—[ बाजूस ] गडे यांचा विरह तर भारीच वाढत चालला. आतां काय करावें ?

[ इतक्यांत एक दासी वस्त्राभरणें घेऊन येते. ]

दासी०—बाईसाहेब, राणी साहेबांनीं हीं भूषणें आपणांकडे पाठविलीं आहेत.

मंजु०—अग, माझ्या अंगवरीलच भुषणें मला नकोशीं झालीं आहेत आणि हीं कशाला. [ असें म्हणून गळ्यांतील नवरत्नाचा हार काढून टाकते. ]

दु० दासी—[ तिसरीस ], हीं भूषणें घेऊन जा पाहूं.

ति० दासी—ठिक आहे. [ भूषणें घेऊन जाते ]

प० दासी—[ हार घेऊन ] बाईसाहेब.

**पद** " उयर्थ अम्हि अबला० " ही चाल.

जाउं चला सदनीं ॥ बाई जाउं चला० ॥ धृ० ॥ या हारातें ॥ कंठी घाला ॥ देतें पुष्पसेज करुनी ॥ खचित बाई जाउं चला० ॥ चंदन उटितें अंगि लावितें ॥ उठा चला निघुनी ॥ खचित बाई जाउं चला० ॥ १ ॥

**मंजु०**—सखे.

**पद**—"लाल शालजोडी जरतारी०" ही चाल.

होइल कैशी पुष्पशेज ती पाहुनि शांती सखये मनीं ॥ सौख्य न वाटे लवही मजला शशिकिरणांतें पाहोनी ॥ चंदन उटिनें वाटे करिती दंश अही मज लागोनी ॥ घालुनि नवरत्नाच्या हारा शांति कशी होईल जनीं ॥१॥

[ असें म्हणून मूर्छित होते. ]

**पहि० दासी**०—[ लगबगीनें वारा घालून ] आतां काय करावें त्या सावध तरी कशा होतील.

" अंजनीगीत "

नकळे आतां काय करावें ॥ यांनां महालीं कैसें न्यावें ॥ शांतवनातें केवि करावें ॥ यांचें या समयीं ॥ १ ॥

(दुसरी दासी पाणी आणून मंजुघोषेच्या नेत्रांस लावते]

**दु० दासी**—[ पाणी लाऊन ] काय करावें बाई, अजूनही ह्या सावध होत नाहींत. [ वारा घालून ] बाईसाहेब, सावध व्हा, सावध व्हा.

**मंजु०**—[सावध होऊन] गडे चला महालांत जाऊं.

[ दासीसह निघून जातें इतक्यांत कंचुकी येतो ]

**कंचुकी**—[ प्रवेश करून ] अहाहा ! इतर जनांस कंचुकीचें काम ह्मणजे फार सुखावह वाटतें, परंतु ती त्यांची मोठी चूक आहे. असो, आतां वसंतमाधवजींनीं सांगितल्या प्रमाणें बागेंत कोणी दुसरें मनुष्य आहे कीं काय तें पहावें.

"पडद्यांत" मित्रा असा इकडून ये.

**कंचु०**—( इकडे तिकडे पाहून सभयाश्चर्ये ) अरे, वसंतमाधवांसह स्वारी तर बागेंत येऊन पोंचली. आतां काय करावें. ( थांबून ) हो दुसऱ्या वाटेनें निघून जावें हेंच योग्य. (जातो)

( तदनंतर मदनासह वसंतमाधव येतो )

**मदन**—असा इकडून ये मित्रा.

**वसं०**–( मंजुघोषेच्या विरहानें )

**पद**—"सुवर्ण केतकी०" ही चाल.

भंग न व्हावा रतिचा सखये इच्छितसे जो नित्यमनीं ॥ प्रीतियुक्त गे तुजविषयीं जो अंतरलिस त्या लागोनी ॥ धृ० ॥ ह्या दासातें प्रियभाषाणि तुज काय दोष तो आढळुनी ॥ करिशी कोपा कांगे मजसी जाळि तनु तव विरहाग्नी ॥ चंद्रोदय नसतांना शोभे नभभागीं कशि ती रजनी ॥ मन्मन होतें तेवि सखेगे तव वदनांबुज ना दिसुनी ॥ १ ॥

**मदन**—( वसंतमाधवास ) बाबा, पुरे झाला तुझा शोक. चल आतां ह्या वृक्ष छायेखालीं बसून थोडी विश्रांति घेऊं.

**वसं०**–बरं, चल पुढें हो.

**मदन**–असा इकडून ये मित्रा.

**वसं०**–मित्रा---

पद.-"काय मला भूल०" ही चा०.

विपरित हा दैव योग काय पातला ॥
दुःख सोसण्यासि जन्म काय घेतला ॥ धृ० ॥
भूपाग्रह काय करूं फार जाहला ॥ लग्नासि
येत असे न वदवेना मला ॥ होईल बहु विरस
असा हेतु धरियला ॥ जाउनियां च्यार दिवस
पाहुं सोहळा ॥ परि सखिचा विरह मनीं फार
याढला ॥ १ ॥

**मदन**-मित्रा. व्यर्थ शोक करूं नको. तूं अरण्यांत पडला नाहींस. तुझी आणि तुझ्या प्रियेची लौकरच भेट होईल.

**वसं०**-मित्रा, तें सर्व खरें, पण मी काय करूं! अंगुली मुद्रा पहा कशी माझा विरहाग्नी द्विगुणीत करीत आहे. **पद**-"साध्य नसे मुनिकन्या०" ही चाल.

सोडुनि मत्प्रिय सखीला ॥ कां आलिसगे
या स्थानाला ॥ धृ० ॥ प्रतिज हस्तीं माझ्या
बघुनी ॥ शांति न वाटे सत्य मन्मनीं ॥
विरहाग्नी बहुजाळी ॥ प्राणसखीचा माझ्या
तनुला ॥ १ ॥

( बोटांतील आंगठी काढून फेंकून देते )

**मदन**–मित्रा त्या आंगठीनें तुझा काय बरें अपराध केला आहे ? तूं इथें बैस मी ती घेऊन येतो.

[ चुकीनें मंजुघोषेची आंगठी आणतो. ]

**वसं०**—( आंगठी पाहून ) काय, माझ्या नांवाची ही आंगठी ! अहाहा ? ही आंगठीतर मी माझ्या प्रियेला दिली होती, ती इथं कशी आली ?

**मदन०**—मित्रा, तुझी प्रियाही तुजप्रमाणें लग्नाकरितां इथं आली असेल म्हणून ही आंगठी इथं आली.

**प० दासी**--( प्रवेश करून ) बाईसाहेबांनीं आंगठी घेऊन येण्याकरितां मला पाठविलें आहे. ( जमीनीवर आंगठी शोधूं लागते )

**प० दासी**—( वसंतमाधवाजवळ येऊन ) महाराज, आमच्या मंजुघोषा बाईसाहेबांची ह्या बागेंत सांडलेली आंगठी ( मदनाकडे बोट करून ) ह्यांना सांपडली आहे तरती देण्यास सांगा.

**वसं०**—( मित्रा, दे तिला तुझ्या हातांतील आंगठी )

**दासी**—(निघून जाते )

**मदन**--मित्रा, कसें काय ? मी सांगितलेलं वचन खरें झालें कीं नाहीं. आतां लाडूबिडूची तयारी केली पाहिजे.

**वसं**--( हंसून ) ठीक आहे.

**मदन**—येतों तर मी आतां. ( जातो )

( मंजुघोषा )

**मंजु०**—[ प्रवेश करून ] दासीनें जी आंगठी आणिली ती तर मी प्राणनाथांना गांधर्व विधीच्या वेळीं दिली होती. ती येथें कशी आली हें कांहींच कळत नाहीं. [ पाहून ] अग बाई, ते समोर बसलेले गृहस्थ प्राणनाथांसारखे दिसतात; किंवा तेच हे नसतीलना ?

**वसं०**—( वर उठून आनंदानें) अहाहा ! हीच ती माझी प्रीया.

( एकमेकांस आलिंगन देतात )

**मंजु०**—

" अंजनीगीत "

नाथा उदधी त्या स्थळीं खवळुनी ॥ गेलें बालक त्यांतुनी वाहुनी ॥ भूकंपा मग तेथें होउनी ॥ या स्थलिं मी आलें ॥

**वसं०**—प्रिये, काय सांगु–

'साकी'

प्रिय बाळासह सोडुनि तुजला अन्न विमानीं भरूनी ॥ परतुनि येतां वहान माझें गेलें सखये जळुनी ॥ झालें दुःख अती ॥ त्या समयीं मज सांगु किती ॥ १ ॥

प्रिये चल आतां आपण मंदिरांत जाऊं, तेथें तुला सर्व हकीगत कळवीन.( असें म्हणून निघून जातात )

( पडदा पडतो )

अंक ६ सहावा समाप्त.

## अंक ७ वा.

[मंजुघोषेचें वालक कांहीं मुलें बरोबर घेऊन खेळत प्रवेश करतो ]

**बालक**—कायरे गड्यानों, आपण आज कोणता खेळ खेळू या ? **दुसरा**—विटिदांडू खेळू या.

**तिसरा**—अरे, तुमचा खेळ राहूं द्या. तो पहा कोणाचा रथ इकडे येत आहे.

**बालक**—अरे हा, खरेंच.

[ इतक्यांत रथांत बसलेली मंजुघोषा व वसंतमाधव येतात ]

**वसं०**--अहाहा ! प्रिये, पहा आपला रथ किती

वेगानें चालला आहे तो.

**मंजु०**--प्राणनाथ, आतां जवळपास रहाण्याकरितां कुठें तरी जागा पहावी हें बरें.

**वसं०**--ठीक आहे.

[ इतक्यांत बालक त्याच्यापुढें येतें ]

**बालक**--अहो, तुह्मीं कोण अहांत व ह्या अरण्यांत येण्याचें कारण काय ?

**मंजु०**--[ त्याच्याकडे पाहून सप्रेम ] बाळा,

पद. " झाली ज्याचीं० " ही चाल.

शोधितसों आह्मीं प्रिय बाळाला ॥ जलधींतुनि जो वाहुनि गेला ॥ वदनेंदु तव दिसतो त्यासम ॥ परि ओळख नच पटते मजला ॥ कंठुं कसे दिन त्याविण भुवनीं ॥ सततचि वाहे जल नयनाला ॥ १ ॥

**बाल०**--[ आपल्याशीं ] ह्यांचें सांगणें माझ्या कथानकाशीं जुळतें खरें. काय बरें असेल हें ?

**वसं०**--बाळा, कायबरं विचार करतोस. तुला पाहून माझ्या पुत्राचें मला स्मरण होत आहे. तुझें जनन कसें झालं आणि तूं येथें कसा आलास ?

**बाल०**--ऐकावं महाराज, माझें जनन अरण्यांत होऊन भूकंपानें मी समुद्रातून वाहून गेलों, त्या वेळीं माझ्या अंगावर एक लाल शाल मात्र होती.

**वसं०**--( उत्कंठेनें ) बाळा, त्या लाल शालीची कांहीं खुण स्मरते का ?

**बाल०**—होय महाराज, त्या शालीवर 'मंजुघोषा' अशीं अक्षरें लिहिलेलीं आहेत.

( हें ऐकतांच वसंतमाधव व मंजुघोषा रथांतून खालीं उतरतात ) **मंजु०**—( आनंदानें )

**पद**—" सोडुनि मज रामराय० " ही चाल.

झडकरि ती लाल शाल दाखवी मला ॥ तिजवरील नांव बहु तोष दे मुला ॥ धृ० ॥ गुंडाळुनि बाळ त्यांत । ठेवियलें मी वनांत । वाहुनियां जलधि वहुत । गेला मम तनय वहात । वाटतसे सुदिन खचित आजि पातला ॥ १ ॥

**बाल०**--( सोबत्यांस ) गड्यानों, जा घरें माझ्या आजोबाला शाल घेऊन इकडे पाठवून द्या.

**खेळगडी**—ठीक आहे. ( जातात )

**वसं०**—प्रिये, आपल्या बाळाची आणखी कांहीं तुला खूण आठवते का ?

**मंजु०**-होय, त्याच्या उजवे बाजूवर एक तीळ होता.

**वसं०**-बाळ, तुझा बाहु पाहुं दे.

( बालक वसंतमाधावाकडे जातो, इतक्यांत राजा चंद्रशेखर येतो. )

**चंद्र०**-प्रियापुत्राची भेट झालेल्या माझ्या जामा-

त्याचा विजय असो. **वसं०**—महाराज, मी वंदन करितों.

**चंद्र०**—दीर्घायुषी हो,

**मंजु०**—ताता, मीही वंदन करितें.

**चंद्र०**— "साकी"

दुर्मिळ ऐसा लाभ मला हा घडलागे प्रिय तनये ॥ विरहानें तव कृश तनु झाली भेट मला दे ये ये ॥ नेली तव जननी ॥ काळानें त्या यमसदनीं ॥ १ ॥

असो चला आतां आपण पर्णकुटिकेंत जाऊं. कांहीं दिवस या ठिकाणीं विश्रांति घेऊन नंतर आपल्या राज्यांत निघून जाऊं.

**वसं**—आज परमेश्वराच्या कृपेनें सर्वांच्या एकत्र भेटी होऊन आज हा सुदिन पाहिला या बद्दल त्याचे उपकार मानून नंतर जाऊं. **भरतवाक्य.**

**पद** "सुंदरमुख तुंदिल०" ही चाल.

शशिशेखर भो हर हर सदय शंकरा ॥ दीनोद्धर विश्वंभर हे महेश्वरा ॥ ध्रु ॥ सकल सुरामाजि श्रेष्ठ असशि तूं खरा ॥ निज भक्तां प्रेमभरें रक्षिशी पुरा । जाणुनि हें पदकमलीं विनति [illegible] ॥ भव निधितुनं मज उतरी देउनी करा सुमती नीती शांती दे चिर हरि कुमती ही विनती ॥ तुजसि ईश्वरा ॥ १ ॥

( समाप्त )